

# मार्टिन ल्यूथर किंग

(सचित्र जीवनकथा)

लेखिका: मार्गारेट बून-जोन्स
चित्रे: रोझेल स्कॉट

मराठी अनुवाद: तृप्ती कर्णिक

# मार्टिन ल्यूथर किंग

(सचित्र जीवनकथा)



लेखिका: मार्गारेट बून-जोन्स
चित्रे: रोझेल स्कॉट

मराठी अनुवाद: तृप्ती कर्णिक



मार्टिनच्या कुटुंबामध्ये पाच सदस्य होते. त्यांचे बाबा रेव्हरंड; आई मिसेस किंग, मोठी बहिण क्रिस्टीन आणि धाकटा भाऊ अल्फ्रेड आणि मधले. मार्टिन.

किंग कुटुंबीय अटलांटा, जॉर्जिया इथे एका आलिशान घरात राहत होते.

ते खूप सुखी आणि आनंदी कुटुंब होते.



मार्टिनचे वडील पाद्री होते त्यामुळे सर्व लोक त्यांना रेव्हरंड किंग ह्या नावाने हाक मारायचे.

किंग कुटुंब दर रविवारी चर्च मध्ये जायचे. तेव्हा मार्टिनला आपल्या वडिलांचे प्रवचन ऐकायला प्रचंड आवडे.

वडिलांच्या भारदस्त भाषेने मार्टिन भारावून जाई. मार्टिनने जाहीर केले कि मोठा झाल्यावर तोही अशीच भारदस्त भाषा वापरणार.



मार्टिन फार उंच नव्हते पण त्यांची प्रकृती दणकट होती. मुलांना जे जे खेळ खेळायला आवडतात ते ते सगळे खेळ त्यांनाही खेळायला आवडायचे.

फुटबॉलच्या खेळात ते वेगवान पळणारे खेळाडू होते.





बेसबॉलमधे त्यांच्या भागातले ते एक उत्कृष्ट बॅटर होते. प्रत्येक डाव आपण जिंकलाच पाहिजे ह्या इर्षेने ते नेहमी खेळायचे.



किंग कुटुंबातील मुलांना बास्केटबॉल खेळायला फारच आवडे. त्यासाठी त्यांच्या बाबांनी मागच्या अंगणात मुलांसाठी एक बास्केटबॉल कोर्ट तयार केले होते.

मार्टिनना भांडायला अजिबात आवडायचे नाही. कुणाबरोबर ते कधीच भांडणाची सुरुवात करीत नसत. पण जर एखादा मुलगा उगाच एखाद्या मुलीला त्रास देत असेल अथवा छोट्या मुलांची खोडी काढत असेल तर मात्र ते त्याला रागावत आणि तसे करण्यापासून प्रवृत्त करत. पण त्यांचा राग फार वेळ टिकत नसे. त्या मुलाशी त्यांची लगेच खास मैत्रीही होऊन जाई.



मार्टिन, क्रिस्टीन आणि अल्फ्रेड छोटे होते तेव्हा शेजारच्या-पाजारची काळी-गोरी मुलं आणि ते सर्व एकत्र खेळायचे. परंतु ते शाळेत जायला लागल्यावर गोऱ्या मुलांनी त्यांचाकडे खेळायला येण्याचे बंद केले.

मार्टिनच्या लक्षात आलं की गोरी मुलं-मुली आणि क्रिस्टीन, अल्फ्रेड व ते ह्यांच्या शाळा वेगवेगळ्या आहेत.





जसजसे ते मोठे होऊ लागले तसतसे त्यांच्या लक्षात येऊ लागले की त्याना तसेच त्यांच्या कुटुंबियांना काही विशिष्ट ठिकाणी जाण्यासाठी परवानगी नव्हती.





ह्या सगळ्या गोष्टी लक्षात आल्यावर त्यांना फार वाईट वाटले. त्यांना कळेना कि असा भेदभाव नक्की कशासाठी केला जातो आहे.

आपण मोठे झाल्यावर काय बनावं ह्याचे विचार त्यांच्या मनात घोळू लागले.

काय वाटतं? ते मोठे झाल्यावर डॉक्टर बनून आजारी माणसांची सेवा करतील?



कि वकील बनून लोकांना न्यायालयात मदत करतील?





त्या दरम्यान ते शाळेत झटून अभ्यासाला लागले. शिक्षकांना अपेक्षित होते त्यापेक्षा खूप जास्त अभ्यास ते करीत असत.

त्यांना पुस्तकाचे प्रचंड वेड होते. ते सतत वाचत. आपल्याजवळील सगळे पैसे ते पुस्तकं विकत घेण्यावर खर्च करीत. त्यांना पुस्तकांचा मोठा संग्रह करायचा होता.

मोठे होऊ लागले तसे त्यांचा पुस्तके वाचनाचा आवेग वाढला. त्यांना चौफेर विषयांवर वाचायला आवडू लागले.

शाळेमध्ये त्यांची प्रगती इतकी उत्तम होती की पंधराव्या वर्षी त्यांचे शालेय शिक्षण पूर्ण झाले. पंधराव्या वर्षी ते कॉलेजलाही जाऊ लागले.

शिक्षण पूर्ण झाल्यावर मार्टिन कोण बनले हे माहित आहे का तुम्हाला?

ते डॉक्टर नाही झाले.

ते वकीलही नाही झाले.

ते आपल्या वडिलांप्रमाणेच पाद्री बनले.

तेही भारदस्त भाषेत बोलू लागले.

ते इतके सुंदर बोलायचे कि त्यांना ऐकल्यावर लोकांच्या मनावरचा ताण हलका होऊन जायचा. त्यांच्या शब्दाच्या प्रभावामुळे लोकांना आतून वाटे ते करण्याचे बळ येई.

आता मार्टिनलाही लोक रेव्हरंड किंग म्हणू लागले.





मार्टिन लूथर किंग ज्या शहरात राहत होते तिथे बसमधे प्रवास करताना काळ्या लोकांना पुढच्या बाकांवर बसायला परवानगी नव्हती. त्यांना नेहमी मागच्या सीटवर बसावे लागे. बसमधे जास्त गर्दी असेल तर त्यांना उठून गोऱ्या लोकांना जागा द्यावी लागे.

मार्टिन म्हणाले, “हा कायदा पूर्णपणे चुकीचा आहे. आपण तो बदलायला हवा.”

“परंतु कसा बदलता येईल?” लोक विचारू लागले.

“जोपर्यंत कायद्यात बदल होत नाही तोपर्यंत बसच्या प्रवासावर आपण सर्वांनी पूर्ण बहिष्कार घालायचा,” मार्टिन म्हणाले.

“मग काय चालत जायचे?”

“हो. ज्यांना शक्य असेल त्यांनी आपल्या मित्राच्या गाडीने किंवा खाजगी टॅक्सी वापरायची. काहीही झाले तरी शांत राहायचे, अजिबात भांडण, मारामारी करायची नाही. गुद्द्यापेक्षा शांततेच्या मार्गाने लढणे कधीही उत्तम.”

रेव्हरंड किंग मधुर भाषेत बोलायचे. कुणाचा द्वेष करू नका, सगळ्यांशी प्रेमाने वागा असे ते आपल्या काळ्या बांधवाना सांगायचे. लोकही ते सांगत तसेच वागत. वर्षापेक्षा जास्त काळ बसेस जवळजवळ रिकाम्या धावत होत्या. बस कंपनी खूप तोट्यात गेली.





शेवटी कायद्यात बदल करण्यात आला. सगळ्या लोकांना बसमधे हव्या त्या जागेवर बसून प्रवास करायला परवानगी देण्यात आली.

मार्टिन लूथर किंगनी पूर्ण अमेरिका तसेच जगभर प्रवास केला. अन्यायकारक कायदा बदलून त्याजागी कल्याणकारी कायदा यावा यासाठी त्यांनी नेहमीच लोकांना मदत केली.

आपल्या हक्कासाठी शांततेच्या मार्गाने लढा देण्यासाठी त्यांनी लोकांमधे जागरूकता निर्माण केली आणि त्यांना सतत प्रोत्साहन दिले.

“नम्र राहा. सर्वांना प्रेम द्या. अभिमानाने मान उंचावता येईल आणि स्वत:चा अभिमान वाटेल असे काम करा.”

त्यांची प्रसिद्धी चांगलीच वाढली होती. रोज त्यांच्यावर एखादी तरी बातमी वर्तमानपत्रात छापून येई. तसेच रेडीओ आणि टीव्हीवरही ते नेहमी झळकत.



१९६४ साली त्यांना जगभरात प्रेम आणि शांतता राहावी ह्यासाठी केलेल्या कामाबद्दल एका मोठ्या बक्षिसाने सन्मानित करण्यात आले.

ते बक्षिस म्हणजे सर्वोच्च मानाचा समजला जाणारा “नोबेल पुरस्कार”. नोबेल पुरस्कार विजेत्याला पुरस्कार म्हणून खास शानदार पदक आणि मोठी रक्कम मिळते.



सांगा पाहू, पुरस्काराच्या ५४,६०० डॉलरचे रेव्हरंड किंगनी काय केले असावे?

त्यातील एकही पैसा त्यांनी स्वत:साठी अथवा कुटुंबियांसाठी वापरला नाही. त्यातून त्यांनी जास्तीत जास्त गरजू लोकांना मदत केली.

आणि अचानक १९६८ मधे एक भयानक घटना घडली. एका माथेफिरूने मार्टिन ल्युथर किंग ह्यांचा गोळ्या झाडून खून केला.

अमेरिकेतील तसेच जगभरातील लोक ह्या घटनेने खूप दु:खी झाले. हजारो लोक त्यांना शेवटची आदरांजली देण्यासाठी गोळा झाले. शाळा आणि कार्यालये त्यादिवशी बंद ठेवण्यात आली.

मार्टिन ल्युथर किंग ह्या जगातून गेले असले तरी त्यांचे विचार आणि कार्य आजही जिवंत आहे. त्यांनी दिलेली मूल्ये, प्रेम, कर्म जास्तीत जास्त लोकांनी आचरणात आणणे हीच त्यांच्यासाठी खरी आदरांजली ठरेल.

समाप्त